# मीनाकुमारी की बेटी ?



**'काहीच्या बाही लोक लिहितात झालं'**

एकदा लाहोरच्या गल्लीतील एका फुटपाथवर एक चोपडे एकाच्या नजरेस पडले. घरी आल्यावर ते फाटके पुस्तक चाळून 'काहीच्या बाही लोक लिहितात' असे मनात म्हणत ते पुस्तक रद्दीत टाकून दिले. रद्दी विकताना ते पुस्तक वाचायची इच्छा झाली म्हणून तो वाचायला लागला. खरे कि खोटे याची शहानिशा करण्यासाठी त्याने शोध घ्यायला सुरवात केली. नंतर जे समोर आले ते तो सादर करत आहे.

सुप्रसिद्ध सिने अभिनेत्री मीनाकुमारीची जीवन कहाणी लेखी स्वरूपात उपलब्ध आहे. माहजबीन नावाने जन्मलेली अलिबक्षची ती मुलगी. अलिबक्ष सध्याच्या पाकिस्तान मधील सरगोधा जवळच्या बेरा गावातला. बलराज सहानी पण तिथलाच असे म्हणतात. गाण्याच्या नादामुळे तो बंबईत आला. पुष्पावती नामक सहकलाकाराशी सूत जमले. पुढे त्यांना संतती झाली. गरिबीमुळे माहजबीनला एका अनाथालयाच्या पायरीवर सोडून बाप परतला. पण पत्नीने कळवळा येऊन त्यांनी मुलीला परत आणले. मास्टर अलिबक्षची मुलगी बाल कलाकार नंतर नावाजलेली अभिनेत्री बनली. कमाल अमरोहींशी तिचा निकाह झाला. आधीच विवाहित अमरोहींशी कटकटी होऊन तलाक होऊन पुन्हा समेट झाला. पाक़ीजा सिनेमा प्रदर्शित झाला अन आजारी मीनाकुमारीचे निधन वयाच्या ३९व्या वर्षी, ३१ मार्च १९७२ रोजी झाले. ती वांझ होती असे सर्वांच्या वाचनात आहे.

मग त्या पुस्तकात म्हटलेले खरे असेल का? म्हणून यानी शोध सुरू केला. जुने पुस्तक होते. प्रकाशन संस्था बंद पडली होती. लेखकाला कसे शोधायचे? पण त्या आधी त्यात सुचवलेले संदर्भ शोधून काढले पाहिजे होते. म्हणून तो कामाला लागला. कराचीतील एक रिपोर्टर अमीर हुसेन चमन यांनी कमालचे भाऊ रईस अमरोही जे पाकिस्तानात स्थायिक झाले होते त्यांच्या १९७३च्या सुमारास मुलाखती घेतल्या. लंडन मध्ये काही पेपर मध्ये छापून आल्या. ३० वर्षांनी ते सर्व २००३ साली त्यांनी एका पुस्तकात प्रकाशित केले. त्याचे नाव दिले होते 'मीनाकुमारी मेरी भाभी'.

**ज्या व्यक्तीने रद्दीत सापडलेले पुस्तकातले संदर्भ शोधून काढले त्याने आपले टोपणनाव शहाकार उर्दू घेतले. ते काय म्हणतात?**

मीनाकुमारीची एक मैत्रीण होती तिचे नाव होते रझिया सुलताना. सन १९५८ च्या सुमारास तिने एका मुलाला जन्म दिला त्याचे नाव होते समंद. रझियाला आधीच एक मुलगी होती. ज्या इस्पितळात ती होती तिथे तिच्या एका महमदी बेगम नावाच्या मैत्रिणीने एका मृत मुलीला जन्म दिला. असीहुद्दीन आणि रझिया सुलताना कुटुंब समोरासमोर राहात होते. महमदी बेगमच्या शौहराने म्हटले की माझ्या आईला कळले की पुन्हा मेलेली मुलगी झाली तर ती मला पुन्हा निकाह करायला भाग पाडेल. ती आज घरी येत आहे. तिच्या समजुतीसाठी तुमचा मुलगा आम्हाला द्या. ती गेली की मुलगा परत करू. रझियाने नाही म्हणत असताना  शौहर असीहुद्दीनने मुलाला शेजारणीला दिले. मात्र सासूने ४ दिवस आपला मुक्काम वाढवला. त्या काळात महमदी बेगमने आपले दूध देऊन मुल वाढवले. नंतर परत केल्यावर ते बाळ रझियाचे दूध पीना. म्हणून दूध पाजायला ती महमदी बेगमकडे जाऊन येत असे. महिनाभर झाला असेल. रझियाचा शौहर असीउद्दीन पोलीसात होता. त्याचे आपल्या वरिष्ठांशी भांडण झाले. त्याने गोळी झाडली. वरिष्ठ मेला असे वाटून असीउद्दीन रातोरात पाकिस्तानात कराचीला पळाला. तिथेच नोकरी करू लागला. पोलिसांनी रझियाला नजरकैदेत ठेवले. मुलाला दूध पाजायला समोरच्या मैत्रीणीला भेटणे दुरापास्त झाले. असेच ३ वर्षे गेली. मधल्या काळात मैत्रिणीचे कुटुंब निघून गेले. पोलीस त्रासाला कंटाळून ती पण पाकिस्तानात कराचीला शौहर समेत जाऊन राहू लागली. त्या काळात असे देशांतर सर्रास चाले.

रझियाला नंतर ३ मुले झाली. पण समंदची आठवण तिला बेचैन करत होती. एकदा महमदी बेगमची नातलग तिला पाकिस्तानात भेटली. भारतात महमदी बेगमचा पत्ता दिला. तेंव्हा ती ७ महिन्याची पोठूशी होती. असीहुद्दीनने अशी गर्भार असताना जाऊ नकोस म्हणून धमकावले. तरीही रझिया भारतात आली. त्या वेळी समदचा खतना करायचा विधी केला जात होता. महमदी बेगम म्हणाली, 'तुझा मुलगा १८ वर्षे पूर्ण झाली की तू त्याला पाकिस्तानात घेऊन जा' . मुलाला जवळ घेतले की मी तुझी मावशी आहे म्हणून. आधी कधी न भेटलेली 'खाला' इतके का जवळ का घेते आहे म्हणून तो १३ वर्षाचा पोर भांबावून गेला. व लांब पळायला लागला.

रझिया जिना उतरताना घसरून पडली. एक मुल मेलेले जन्मले. तर दुसरे समोर असून मां मानत नव्हते. नवऱ्याला कळले तर तो आपल्याला हाकलून लावेल अशी भिती वाटत होती. त्या काळात ती आपली मैत्रीण मीनाकुमारीला भेटायला गेली तेंव्हा मीनाकुमारीची २ ते ३ महिन्याची मुलगी चमच्याने दूध पीत होती.
रझियाच्या गोदीत ती मुलगी अशी सामावली की जणू ती तिचीच मुलगी आहे. ते पाहून मीनाकुमारी म्हणाली, 'रझिया तुझी मुलगी तू नुकतीच गमावली आहेस. तू या मुलीला सांभाळ. मी माझ्या बाळंतपणासाठी खूप मोठी रिस्क घेतली होती. पण तिचा बाप आपले नाव द्यायला तयार नाही. वाटले होते की मुलगा होईल. त्याला व मला अमरोहींचे नाव मिळेल. माझी तब्येत चांगली नाही. तू मुलीला घेऊन पाकिस्तानात जा. भारतात येताना तुझ्या नवऱ्याने तुला सोडायची धमकी दिली होती मुलीला पाहून तो ही शांत होईल'. रझियाला काय करावे कळत नव्हते. मीनाकुमारीने तिच्या विसाची सोय करून दिली.
' मी तुला वचन देते की मी जीवंत असे पर्यंत ही गोष्ट माझ्याकडे राज राहील. तू माझ्यावर मेहेरबानी कर' मीनाकुमारी म्हणाली. रझिया पाकिस्तानात आली इतर मुलाबाळांत वाढू लागली. बाप असीहुद्दीन रझियाला म्हणायचा, 'तू तिला मीनाकुमारीच्या गोद मधे ठेवले होते म्हणून तिच्यात मीनाची झाक वाटते'. ती घरात आल्यापासून बापाला व्यापारात बरकत झाली. तो दुबईत कुटुंब घेऊन जाई तर कधी दुबईहून भेटायला येई. रझियाने तिचे नाव झेबाच ठेवले. पण बाप कौतुकाने गुलजेब म्हणायचा.

## ही मुलगी सुपर जीनियस आहे.

गोष्टी इतक्या जुन्या काळातील आहेत त्यामुळे मीनाकुमारी शिवाय कोणाचेही फोटो उपलब्ध नाहीत. झेबा कराचीतील शाळेत जायला लागली. लहान असताना शेर लिहायच्या आवडीचे कौतुक व्हायला लागले. एका डॉक्टरने म्हटले की ही मुलगी सुपर जीनियस आहे. बापाला

शेरोशायरीची चीड होती. तो ते कागद फाडून टाके. मधल्या काळात १८ समद वर्षांचा झाला. तिथे त्याला कळले की आपले खरे मा बाप पाकिस्तानात आहेत. तो तिथे कराचीत पोचला. आणि त्यांच्या घरात राहू लागला. मुले १४, १५ ची झाली की शादी करून द्यायचा रिवाज होता.
१९८१ मधे झेबाचा निकाह सिंध मधील गबर आणि नामी घराण्यात झाला. पुढे तिला एक मुलगी व मुलगा झाला. पण नवऱ्याच्या छळाला कंटाळून तिने खुला मागितला. नवऱ्याने चिडून तिला एका रात्री घराबाहेर काढले गेले. कशीबशी पायी तिने माहेरचा दरवाजा ठोठावला. तिथे तिला 'आमच्या घरी येऊ नकोस' म्हणून धुतकारले गेले. 'आपल्या सासरी जा. अशी परित्यक्ता म्हणून आमची बेईज्जती होईल'. दुबईहून बापाने तसेच म्हणले म्हणून नवऱ्याला बोलावून सुलह करायचा प्रयत्न केला गेला. या दरम्यान झेबा पडली. डोक्याला मार लागला. तिने डोळे उघडले तेव्हा ती कराचीतील एका खैराती इस्पितळात होती. रझिया तिला म्हणाली, 'झेबा, तुझी मुले पण आमच्याकडे सोडून शौहर गेला आहे. तुला आमच्या घरी राहायला मना आहे.
त्या काळात कराचीहून एक प्रकाशित होणाऱ्या एका नियतकालिकाने दिलेले पैसे नवऱ्याने हडप केले. ती एके ठिकाणी नोकरी करत होती तिथून तिला हाकलून दिले गेले. फक्त १३ रुपये घेऊन एक दीड वर्षाचा मुलगा आणि ४ महिन्याची मुलगी घेऊन सायकल रिक्षात बसून ती एका चौकात उतरली. एका चाळीत तिसऱ्या मजल्यावर जागा घेतली.  एक नोकरी पकडली. **तिला ५ लाखांची लॉटरी लागली**. सहा महिन्यांत अर्थिक स्थिती सुधारली. भावाच्या लग्नात तिला बोलावले होते. तिथे काही नातलग भारतातून आले होते. काहींना झेबा मीनाकुमारीची मुलगी आहे हे माहीत होते. झेबाला ते ऐकून तेंव्हा धक्का बसला जेव्हा रझियाने हो म्हटले. झेबाचे हे घर तुटले.

'

## मीनाकुमारीची मुलगी म्हणूनच कशी एक्टिंग करायची बघा' वगैरे टोमणे समाजात सुरू झाले.

झेबा आपली सख्खी बहीण नाही कळताच तिला लग्न समारंभातून हाकलून दिले गेले. असीउद्दीनला कळले रझियाने आपल्याला खोटे सांगितले होते. तो नाराज झाला. दुबईत मुंबईतील एका बाईशी दुसरी शादी करून रझियाशी संबंध तोडले. कालांतराने ते ही वारले. झेबाची मुले मोठी झाली ती आपल्या आजोळी राहायला गेली. झेबाने ग्रॅज्युएशन केले, लॉची डिग्री मिळवली. २००२ मधे ती पीएच.डी करत होती.

**मीनाकुमारीला जाऊन १२ वर्ष झाली होती. कमाल अमरोहींचे निधनाची बातमी ऐकून ती जॉन एलिया यांना भेटली. ते कमाल अमरोहींचे सख्खे चुलत भाऊ होते. त्यांनी तिला सांगितले, 'तू मीनाकुमारीची मुलगी आहेस. हे कमाल अमरोहीना माहित नव्हते. मीनाने आपली मुलगी तिच्या पाकिस्तानी मैत्रीणीला दिली होती इतपत माहित होते. कमाल वारले तेव्हा मीच जवळ होतो'. ते म्हणायचे, 'मीनाकुमारीला, तिच्या मुलीला मी घरचांच्या दबावामुळे सन्मान देऊ शकलो नाही. याचे दुःख मला सदैव राहील' .**

जॉन ऐलिया हे त्यांचे टोपण नाव होते. खरे नाव होते सईद सिब्ते असगर नकवी होते. तेही महिन्याभरात वारले.

इम्रान खान यांनी तिला एक तडफदार खातून म्हणून २००२ च्या निवडणुकीत तिकिट देऊ केले. मात्र एका निवडणुकीच्या जलशात काही बायकांनी तिला' तवायफ़ की दो टके की औलाद' म्हणून नालस्ती केली. 'मीनाकुमारीची मुलगी म्हणूनच कशी एक्टिंग करायची बघा' वगैरे टोमणे समाजात सुरू झाले. तेव्हापासून ती समाजिक कार्यक्रमात पासून दूर राहू लागली. दरम्यानच्या काळात तिला मुंबईत अमरोहींचे दोन मुलगे व एक मुलगी असल्याचे समजले होते. ती ५ वर्षांची होती तोपर्यंत मीनाकुमारी जीवंत होती. झेबा म्हणते, 'मला हे तेंव्हा कळले असते तर मीनाकुमारीला मूल नव्हते हे मी स्वतः माझ्या साक्षीने तेव्हा सांगितले असते'.

'जे झाले ते झाले, मी आता ऑगस्ट १९९७ नंतर निसार एहमद निजामानी सांगड सिंधींची पत्नी आहे. मला सिनेमात काम करायला मीनाकुमारीचे नाव वापरायचे नव्हते. मी माझ्या गुणामुळे ओळखली जावी अशी माझी इच्छा आहे'.

सध्याच्या काळात झेबा कुठे आहे ती दिसते कशी? रद्दीतील पुस्तक लेखक अमीर हुसेन चमन, जीवंत आहेत का? वगैरे जाणून घेण्यासाठी या बातमीचे शोधक शाहकार उर्दूना यश मिळेल का असे त्याना वाटत राहिले¶

# मीनाकुमारी की बेटी? भाग २





मीनाकुमारी की बेटी - गुलझेब झेबा

वरील व्हिडीओ क्लिप पाहून अनेकांनी विचारणा केल्या की सध्या ती कुठे आहे? काय करते? चमन जीवित आहेत का?

काहींना डी एन ए टेस्ट केली का? वगैरे... काहींना खरे आहे याची खात्री झाली. काहींनी सगळे ढोंग आहे असे काही नव्हते असे म्हटले.
प्रत्येकाची आपापली मते.

## फेब्रुवारी २०२० मधे शोघ घेतला तेंव्हा...

अमीर हुसेन चमन कराचीत असतात. त्यांना त्यांच्या मुलीने अमेरिकेतून पाहून ही क्लिप लिंक दिली. चमन यांनी अशा रितीने त्यांचे पुस्तक १७ वर्षांनी प्रकाशात आणल्यामुळे आनंद व्यक्त केला. गुलरेझ झेबाने क्लिप लंडनमधे पाहिली नंतर शाहकार यांच्याशी फोनवरून बोलणे केले. काही फोटो व लिंक्स दिल्या.

### त्या खाली देत आहे. शाहकार उर्दू यांचे खरे नाव सैयद रजील हसन आहे.



